क्रमांक: उसप-१३०८/प्र.क्र.१४२/०८/१४
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २० जुलै, २००९

पहा:- सा.प्र.वि. क्रमांक:- बीसीसी-२००१/१८८७/प्र.क्र.६४/०१/१६-ब, दि.१.०४.२००८

**आदेश**

याचिका क्र.८४५२/२००४ च्या संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन पत्रान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून खालील अवर सचिवांना उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांच्या नावासमोर स्तंभ-४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अवर सचिवाचे नांव | सध्याचा विभाग | उप सचिव पदावरील पदोन्नतीने पदस्थापना दिलेला विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.पु.हि.वागदे, अ.जा. | महसूल व वन विभाग | उच्च व तंत्र शिक्षण विभाग |
| २ | श्री.आ.श्रा.जिवने, अ.जा. | वित्त विभाग | नगर विकास विभाग |
| ३ | श्री.का.तु.सातकर, अ.ज. | सामान्य प्रशासन विभाग | नगर विकास विभाग |

२. सदर अधिका-यांची उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांच्याविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे

(अ) वरील अधिका-यांची तदर्थ पदोन्नती मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

(ब) सदर तदर्थ पदोन्नती प्रथम अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित अवर सचिव नियुक्त होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरिता असेल.

(क) वरील अधिका-यांची सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात आली आहे.

(ड) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिका-यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०७२०१४४७२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(वि.ग.दळवी)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
३. प्र.स.(सेवा), सा.प्र.वि.,
४. अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, म. व व.वि./उ.व तं.शि.वि./वि.वि./न.वि.वि.
५. सह/उप सचिव/(आस्थापना), म. व व.वि./उ.व तं.शि.वि./वि.वि./न.वि.वि/सा.प्र.वि.
६. संबंधित अधिकारी (विभागामार्फत)
७. सा.प्र.वि./का.१३/का.१०.,
८. निवडनस्ती/का.१४